**जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव अंतर्गत यांत्रिकी विभागीय पथक व त्याअंतर्गत ३ उप विभागीय पथके रुपांतरणाने निर्माण करणे तसेच ४ उप विभागीय कार्यालये बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन १६ नवीन सिंचन शाखा निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा २०१४/प्र.क्र.२१०/२०१४/आ.(प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: **२७ ऑगस्ट, २०१४**

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.**
2) **शासन निर्णय क्रमांकः १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.**
3) **शासन निर्णय क्रमांकः आढावा १००२/३३५/२००२/आ (प्रशि), दि.६/२/२००३.**
4) **शासन निर्णय क्रमांकः एमआयएस-१०९०/६५/९०/आ.(क्षेप्र.), दिनांक १/७/१९९१.**
5) **शासन निर्णय, जसंवि, क्रमांक:-मुदतवाढ-२०१४/प्र.क्र.५६/२०१४/मप्र, दि.१४/६/२०१४.**

**प्रस्तावना**

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या महामंडळांतर्गत जळगांव, धुळे, नंदुरबार व नाशिक या जिल्ह्यात एकूण ३ मंडळ कार्यालय, १४ विभागीय कार्यालय, ७२ उपविभागीय कार्यालये व ६२ शाखा कार्यालये कार्यरत असून त्यापैकी १८ शाखा कार्यालयांना पदांशिवाय मंजूरी देण्यात आलेली आहे.

या महामंडळांतर्गत पूर्ण झालेले ८ मध्यम प्रकल्प तसेच ३० लघु पाटबंधारे योजना व मुक्ताईनगर उपसा सिंचन योजना देखभाल दुरुस्ती व सिंचन व्यवस्थापनासाठी लाभक्षेत्र विकास प्राधिकरण (कडा) विभागांकडे हस्तांतरीत करणे आवश्यक आहे. तथापि, सिंचन व्यवस्थापनासाठी सद्य:स्थितीत उपलब्ध विभाग व उपविभाग व त्या अंतर्गत शाखा कार्यालये अपुरी असल्यामुळे पूर्ण झालेले प्रकल्प हस्तांतरीत करुन घेणे “कडा” विभागास अशक्य आहे. त्यामुळे ज्या उपविभागाकडील प्रकल्पांची कामे पूर्ण झालेली आहेत अथवा पूर्णत्वाच्या मार्गावर आहेत असे विभाग, उपविभाग सिंचन व्यवस्थापन, देखभाल दुरुस्ती व यांत्रिकी कामासाठी त्या त्या कार्यालयांच्या आस्थापनेसह वर्ग करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

तापी खोऱ्यातील उपसा सिंचन योजना व बॅरेजसच्या यांत्रिकी कामाच्या व्यवस्थापनेसाठी व महामंडळाच्या कार्यक्षेत्रातील जळगांव, धुळे व नंदुरबार जिल्ह्यातील प्रगतीपथावरील तसेच नजिकच्या काळात पूर्ण होणाऱ्या उपसा सिंचन योजनांची उभारणी, पंपगृहाचे प्रचलन, बांधकाम, देखभाल व दुरुस्ती परीचलनासाठी आणि यांत्रिकी स्वरुपाची कामे सुलभतेने व नियोजनबध्द तांत्रिक कुशलतेने पूर्ण करण्यासाठी स्वतंत्र यांत्रिकी विभागीय पथक निर्मित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

त्यानुसार चार उप विभागीय कार्यालयांचे बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरण करुन त्या अंतर्गत १६ नवीन सिंचन शाखा निर्माण करण्याचा निर्णय आणि सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव या कार्यालयाचे नामांतराने यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव करुन त्याअंतर्गत ३ उप विभागीय कार्यालयांचे बांधकाम कार्यप्रकारातून यांत्रिकी कार्यप्रकारात रुपांतरण करुन सदर विभागास जोडण्याचा खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

१) जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव अंतर्गतचे मोर मध्यम प्रकल्प उप विभाग, हिंगोणा व हिवरा मध्यम प्रकल्प उप विभाग, पाचोरा तसेच नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे अंतर्गतचे लघु पाटबंधारे बांधकाम उप विभाग, साक्री व नाग्यासाक्या कालवा/प्रकल्प उप विभाग, प्रकाशा ही चार बांधकाम कार्यप्रकारातील उप विभाग कार्यालये सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव अंतर्गतच्या अनुक्रमे जळगांव पाटबंधारे विभाग, जळगाव व धुळे पाटबंधारे विभाग, धुळे या अस्तित्वातील सिंचन कार्यप्रकाराच्या विभागास जोडून आवश्यक १६ नवीन सिंचन शाखा निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२) जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव अंतर्गतचा बांधकाम कार्यप्रकारातील सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव या विभागाचे यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव या नावाने तसेच पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उप विभाग क्र.२, जळगांव, उपसा सिंचन (यांत्रिकी) उप विभाग, जळगांव व सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.१, जळगांव हे बांधकाम कार्यप्रकारातील तीन उप विभाग कार्यालयांचे असे एकूण १ विभाग व ३ उप विभागीय कार्यालयांना यांत्रिकी कार्यप्रकारात रुपांतरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३) बहुळा मध्यम प्रकल्प उप विभाग, खेडगांव, ता.पाचोरा, सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.२,भुसावळ, सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.३, ओझरखेडा, गुणनियंत्रण उप विभाग, वराडसिम व हतनुर प्रकल्प पुनर्वसन उप विभाग, मुक्ताईनगर या उप विभागांच्या विभागीय कार्यालयात, मुख्यालयात, नांवात तसेच कामात बदल करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त प्रमाणे शासन मान्यता प्रदान करण्यात आलेला यांत्रिकी विभागीय पथक व उप विभागीय पथके, सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरण करण्यात आलेल्या चार उप विभागीय कार्यालयांची रचना तसेच इतर पाच उप विभागीय कार्यालयांच्या विभागीय कार्यालयात, नांवात, मुख्यालयात व कामात झालेल्या बदलांबाबतचा तपशील प्रपत्र “अ”, “ब”, “क” व “ड” नुसार व सदर विभागांकडील पदांचा तपशिल प्रपत्र-“इ” व “ई” प्रमाणे राहतील

२. सदर कामासाठी उपरोक्त नमूद केल्यानुसार उपलब्ध करुन दिलेल्या विभाग/ उप विभागाच्या अस्तित्वातील कार्यभार इतर विभाग / उप विभागांकडे सोपविण्याबाबतचे सविस्तर आदेश कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांच्या स्तरावर स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात यावेत.

३. यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव व त्या अंतर्गतच्या कार्यालयांना तसेच सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत होणाऱ्या चार उप विभागीय कार्यालयांना खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) मोर मध्यम प्रकल्प उप विभाग, हिंगोणा, हिवरा मध्यम प्रकल्प उप विभाग, पाचोरा, लघु पाटबंधारे उप विभाग, साक्री व नाग्यासाक्या कालवा प्रकल्प उप विभाग, प्रकाशा या उप विभागीय कार्यालयांकडील बांधकाम कार्यालयांची संपूर्ण आस्थापना मंजूर पदांसह सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरित होणाऱ्या उप विभागीय कार्यालयांकडे वर्ग करण्यात यावी.

आ) सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव, सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.१, जळगांव, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उप विभाग क्र.२, जळगांव व उपसा सिंचन (यांत्रिकी) उप विभाग, जळगांव या विभाग व उप विभागीय कार्यालयांकडील बांधकाम कार्यालयांची संपूर्ण आस्थापना मंजूर पदांसह यांत्रिकी कार्यप्रकारात रुपांतरित होणाऱ्या यांत्रिकी विभागीय पथक व उप विभागीय पथक कार्यालयांकडे वर्ग करण्यात यावी.

इ) सदर यांत्रिकी विभागीय पथक कार्यालय व सिंचन व्यवस्थापन उप विभाग व त्या अंतर्गत रुपांतरीत / फिरवाफिरवीने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या कार्यालयांना आवश्यक असलेली पदे **प्रपत्र “इ” व “ई”** मधील पदांमधूनच वापरण्यात यावी. सद्य:स्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाही.

ई) उपलब्ध रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांकडून समकक्ष वेतनश्रेणीतील पदांची कामे अतिरिक्त कार्यभार देवून करुन घेता येतील.

उ) वर्गीकरण झालेली सर्व कार्यालये शासकीय जागेतच ठेवावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग, उपविभाग व शाखा कार्यालयातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय, आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/ ८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च १९८४ मधील तरतूदीनुसार, यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव या विभागीय पथकाचे "कार्यकारी अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव"यांना आहरण व संवितरण अधिकारी व "अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव" यांना या विभागीय पथकाचे नियंत्रण अधिकारी म्हणून यान्वये घोषित करण्यात येत आहे.

सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरण करण्यात आलेल्या उप विभागीय कार्यालयांचे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रण अधिकारी हे सदर उप विभाग ज्या सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारातील अस्तित्वातील विभागास जोडण्यात येणार आहेत त्या विभागाचेच आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रण अधिकारी राहतील. तसेच, सदर उप विभागांचा खर्च "२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे, ००१ संचालन व प्रशासन, (०४) व्यवस्थापन आस्थापना, (०४)(१०) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेवि, जळगांव (२७०१ ९९६९)" या लेखाशीर्षा खाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव या विभागीय पथकासाठी सदर प्रकरणी होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष "४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०, सर्वसाधारण, ००१ संचालन व प्रशासन, (०१) आस्थापना, (०१)(१०) अधीक्षक अभियंता यांत्रिकी मंडळ, नाशिक (४७०१ ६६७८)" या लेखाशीर्षा खाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उपरोक्त नमूद केलेली कार्यालये तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या महामंडळांतर्गत दिनांक ०१/०९/२०१४ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी. कार्यालयांच्या नावातील बदल दि.०१/०४/२०१५ पासून अंमलात आणावेत. तसेच दि.३१/०३/२०१५ पर्यंत वेतनाबाबत सध्याचीच कार्यपध्दती चालू ठेवण्यात यावी. रुपांतरीत केलेल्या विभाग/उपविभागातील अस्तित्वातील कार्यभार इतर कार्यालयाकडे सोपविण्याबाबतचे आदेश कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी स्वतंत्रपणे निर्गमित करावेत.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/ सीआर/ ८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८२८१८२४१७३०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:27:57 +05'30'

**( सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री (कष्णा खोरे) यांचे खाजगी सचिव
६. मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
८. मा.राज्यमंत्री (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक
९. मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
१०. प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१३. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१४. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक
१६. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१७. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१९. अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव
२०. अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे
२१. अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव
२२. सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. संगणक कार्यक्रम कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२४. कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

**(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र.क्र.२१०/२०१४/ आ.(प्रशि), दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे "प्रपत्र-अ")**

**जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव अंतर्गत अस्तित्वातील बांधकाम कार्यप्रकारातून यांत्रिकी कार्यप्रकारात रुपांतरित होणाऱ्या सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव (नामांतराने यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव) या विभागीय पथकांतर्गतची रचना**

| अ.क्र. | सध्याची आस्थापना **(कार्यप्रकार – बांधकाम)** | | | बदलानंतरची आस्थापना **(कार्यप्रकार – यांत्रिकी)** | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | मंडळ कार्यालय | विभागीय कार्यालय | उप विभागीय कार्यालय | मंडळ कार्यालय | विभागीय कार्यालय | उप विभागीय कार्यालय |
| १ | जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव | सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव | --- | जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव (प्रशासकीय नियंत्रण) व यांत्रिकी मंडळ, नाशिक (तांत्रिक नियंत्रण) | **यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव** | --- |
| २ | | सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव | सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.१, जळगांव | | यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव | **यांत्रिकी उप विभागीय पथक क्र.१, जळगांव** |
| ३ | | लघु पाटबंधारे विभाग, जळगांव | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उप विभाग क्र.२, जळगांव | | यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव | **यांत्रिकी उप विभागीय पथक, धुळे** |
| ४ | | लघु पाटबंधारे विभाग, जळगांव | उपसा सिंचन (यांत्रिकी) उप विभाग, जळगांव | | यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव | **यांत्रिकी उप विभागीय पथक क्र.२, जळगांव** |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:28:22 +05'30'

**( सु. स. डांगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र.क्र.२१०/२०१४/आ.(प्रशि), दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे "प्रपत्र-ब")**
**अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव कार्यालय अंतर्गत बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करावयाच्या उपविभाग व नवीन सिंचन शाखा कार्यालयांचा तपशील व जळगांव पाटबंधारे विभाग, जळगांव कार्यालयाची रचना**

| **सध्याची कार्यालये (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **शाखा कार्यालय** | निर्माण रब्बी समतुल्य सिंचन क्षमता (हेक्टरमध्ये) |
|---|---|---|---|
| कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | | |
| (A) अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव (बांधकाम) अंतर्गत<br>अ) जळगांव मध्यम प्रकल्प विभाग, जळगांव (बांध.) अंतर्गतचे | **(A) अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव (सिंचन) अंतर्गत**<br><br>**अ)जळगांव पाटबंधारे विभाग, जळगांव** (सिंचन कार्यप्रकारातील अस्तित्वातील विभाग) अंतर्गत | | |
| **१) मोर मध्यम प्रकल्प उप विभाग, हिंगोणा (बांधकाम)** | **१) पाटबंधारे उप विभाग, रावेर, ता.रावेर, जि.जळगांव** (सिंचन कार्यप्रकारात रुपांतरित उप विभाग व नावात बदल) | १. पाटबंधारे शाखा हिंगोणा (नवीन शाखा)<br>२. पाटबंधारे शाखा, मंगरुळ (नवीन शाखा)<br>३. पाटबंधारे शाखा, रावेर (नवीन शाखा)<br>४. पाटबंधारे शाखा, विरवाडे (नवीन शाखा) | **८९२२ (हेक्टर)** |
| **२) हिवरा मध्यम प्रकल्प उपविभाग, पाचोरा (बांधकाम)** | **२) पाटबंधारे उप विभाग,जामनेर, ता.जामनेर, जि.जळगांव** (सिंचन कार्यप्रकारात रुपांतरित उप विभाग व नावात बदल) | १. पाटबंधारे शाखा, नांद्रा (नवीन शाखा)<br>२. पाटबंधारे शाखा, जामनेर (नवीन शाखा)<br>३. पाटबंधारे शाखा, जळगांव (नवीन शाखा)<br>४. पाटबंधारे शाखा, भडगांव (नवीन शाखा) | **१४८९७ (हेक्टर)** |
| B) अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण मंडळ, जळगांव (सिंचन) अंतर्गत<br>अ) जळगांव पाट. विभाग, जळगांव (सिं.) अंतर्गतचे अस्तित्वातील सिंचन व्यव. कार्यप्रकारातील उ.वि. | | | |
| १)पाटबंधारे उप विभाग, यावल (अस्तित्वातील) | १)पाटबंधारे उप विभाग, यावल (अस्तित्वातील) | १) शाखा पाडळसा (अस्तित्वातील)<br>२) शाखा भुसावळ (अस्तित्वातील) | |

| **सध्याची कार्यालये (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **शाखा कार्यालय** | निर्माण रब्बी समतुल्य सिंचन क्षमता (हेक्टरमध्ये) |
|---|---|---|---|
| २)पाटबंधारे उप विभाग, सावदा (अस्तित्वातील) | २)पाटबंधारे उप विभाग, सावदा (अस्तित्वातील) | १) शाखा रावेर (अस्तित्वातील)<br>२) शाखा खिरोदा (अस्तित्वातील) | |
| ३)पाटबंधारे उवि.,चोपडा (अस्तित्वातील) | ३)पाटबंधारे उवि., चोपडा (अस्तित्वातील) | १) शाखा हातेड (अस्तित्वातील) | |
| ४)पाटबंधारे उप विभाग, पाचोरा (अस्तित्वातील) | ४) पाटबंधारे उप विभाग, पाचोरा (अस्तित्वातील) | १) शाखा पाचोरा (अस्तित्वातील)<br>२) शाखा जामनेर (अस्तित्वातील) | |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:28:50 +05'30'

( सु. स. डांगळे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र.क्र.२१०/२०१४/आ.(प्रशि), दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे "प्रपत्र-क")**

**अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव कार्यालय अंतर्गत बांधकाम कार्यप्रकारातून सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करावयाच्या उपविभाग व नवीन सिंचन शाखा कार्यालयांचा तपशील व धुळे पाटबंधारे विभाग, धुळे कार्यालयाची रचना**

| **सध्याची कार्यालये (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **शाखा कार्यालय** | निर्माण रब्बी समतुल्य सिंचन क्षमता (हेक्टरमध्ये) |
|---|---|---|---|
| कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | | |
| (A) नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे (बांध.) अंतर्गत<br>अ) धुळे मध्यम प्रकल्प विभाग क्र.२, नंदुरबार (बांधकाम) अंतर्गत | **(A)** लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव (सिंचन) अंतर्गत<br>**अ) धुळे पाटबंधारे विभाग, धुळे** (सिंचन कार्यप्रकारातील **अस्तित्वातील** विभाग) अंतर्गत | | |
| **१) नाग्यासाक्या कालवा प्रकल्प उप विभाग, प्रकाशा (बांधकाम)** | **१) पाटबंधारे उप विभाग, प्रकाशा, ता.शहादा, जि.नंदुरबार** (सिंचन कार्यप्रकारात रुपांतरित उप विभाग व नावात बदल) | १. पाटबंधारे शाखा, प्रकाशा-१ (नवीन शाखा)<br>२. पाट. शाखा, प्रकाशा-२ (नवीन शाखा)<br>३. पाट. शाखा, सारंगखेडा-१ (नवीन शाखा)<br>४.पाट. शाखा, सारंगखेडा-२ (नवीन शाखा) | **२३९७१ (हेक्टर)** |
| ब) लघु पाटबंधारे विभाग, धुळे (बांधकाम) अंतर्गत<br>**१) लघु पाटबंधारे उप विभाग, साक्री (बांधकाम)** | **२) पाटबंधारे उप विभाग क्र.१, ता.साक्री, जि.धुळे** (सिंचन कार्यप्रकारात रुपांतरित उप विभाग व नावात बदल) | १. पाटबंधारे शाखा, सुलवाडे-क्र.१(नवीन शाखा)<br>२.पाटबंधारे शाखा, सुलवाडे-क्र.२ (नवीन शाखा)<br>३.पाटबंधारे शाखा, अमरावती (नवीन शाखा)<br>४.पाटबंधारे शाखा,धुळे (नवीन शाखा) | **१३७७९ (हेक्टर)** |
| **(B)** लाभक्षेत्र विकास प्राधि.,जळगांव(सिंचन) अंतर्गत<br>**ब) धुळे पाट. विभाग, धुळे**(सिंचन कार्यप्रकारातील **अस्तित्वातील** विभाग) अंतर्गत | | | |
| १)पाटबंधारे उप विभाग, धुळे क्र.१ (अस्तित्वातील) | १)पाटबंधारे उप विभाग, धुळे क्र.१ (अस्तित्वातील) | अंतर्गत ७ अस्तित्वातील शाखा | |
| २) पाटबंधारे उप विभाग, धुळे क्र.२ (अस्तित्वातील) | २) पाटबंधारे उप विभाग, धुळे क्र.२ (अस्तित्वातील) | अंतर्गत ५ अस्तित्वातील शाखा | |

| **सध्याची कार्यालये (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात वर्ग करावयाचे कार्यालय (कार्यप्रकार)** (मंडळ/ विभाग/उपविभाग) | **शाखा कार्यालय** | निर्माण रब्बी समतुल्य सिंचन क्षमता (हेक्टरमध्ये) |
|---|---|---|---|
| ३)पाटबंधारे उप विभाग, साक्री (अस्तित्वातील) | ३)पाटबंधारे उप विभाग, साक्री (अस्तित्वातील) | अंतर्गत ४ अस्तित्वातील शाखा | |
| ४)पाटबंधारे उप विभाग, शिरपूर (अस्तित्वातील) | ४)पाटबंधारे उप विभाग, शिरपूर (अस्तित्वातील) | अंतर्गत ५ अस्तित्वातील शाखा | |
| ५)पाटबंधारे उप विभाग, नंदुरबार (अस्तित्वातील) | ५)पाटबंधारे उप विभाग, नंदुरबार (अस्तित्वातील) | अंतर्गत ७ अस्तित्वातील शाखा | |
| ६)पाटबंधारे उप विभाग, शहादा (अस्तित्वातील) | ६)पाटबंधारे उप विभाग, शहादा (अस्तित्वातील) | अंतर्गत ६ अस्तित्वातील शाखा | |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:29:15 +05'30'

( सु. स. डांगळे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र.क्र.२१०/२०१४/आ.(प्रशि), दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे "प्रपत्र-ड")**

**जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव अंतर्गतचे खालील नमूद पाच उप विभागीय कार्यालयांच्या विभागीय कार्यालयात, नांवात, मुख्यालयात व कामात होणाऱ्या बदलासंदर्भाचा तपशील**

| अ. क्र. | सध्याची आस्थापना (**कार्यप्रकार — बांधकाम**) | | | प्रस्तावित आस्थापना (**कार्यप्रकार — बांधकाम**) | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | मंडळ कार्यालय | विभागीय कार्यालय | उप विभागीय कार्यालय | मंडळ कार्यालय | विभागीय कार्यालय | उप विभागीय कार्यालय |
| १ | जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव | मध्यम प्रकल्प विभाग, जळगांव | **बहुळा मध्यम प्रकल्प उप विभाग, खेडगांव, ता.पाचोरा** | जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव | **हतनुर कालवा विभाग, चोपडा** | **निम्न तापी प्रकल्प उप विभाग, पाडळसे, ता.अमळनेर, जि.जळगांव** (पाडळसे येथे इमारत नसल्याने अमळनेर मुख्यालयी कार्यरत राहणार) |
| २ | | सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव | **सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.२, भुसावळ** | | **जळगांव मध्यम प्रकल्प विभाग, जळगांव** | **सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.२, भुसावळ** (दरवाजे व पुनर्वसन कामासाठी) |
| ३ | | सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव | **सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.३, ओझरखेडा** | | **संकल्पचित्र विभागीय पथक, जळगांव** | **सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.३, ओझरखेडा** |
| ४ | | सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव | **गुणनियंत्रण उप विभाग, वराडसिम** | | **हतनुर कालवा विभाग, चोपडा** | **गुण नियंत्रण उप विभाग, अमळनेर** (निम्न तापी प्रकल्प कामे) |
| ५ | | सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव | **हतनुर प्रकल्प पुनर्वसन उप विभाग, मुक्ताईनगर** | | **जळगांव मध्यम प्रकल्प विभाग, जळगांव** | **हतनुर प्रकल्प पुनर्वसन उप विभाग, मुक्ताईनगर** (हतनुर प्रकल्प व पुनर्वसन कामे) |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:29:37 +05'30'

( सु. स. डांगळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**(शासन निर्णय क्रमांक आढावा २०१४/प्र.क्र. २१०/२०१४/आ.(प्रशि), दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे "प्रपत्र-इ")**

**जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव अंतर्गत बांधकाम कार्यप्रकारातुन यांत्रिकी कार्यप्रकारात रुपांतरित होणाऱ्या यांत्रिकी विभागीय पथक, जळगांव या विभागीय पथकासाठी उपलब्ध असलेल्या सरदार सरोवर विभागीय कक्ष, जळगांव व पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उप विभाग क्र.२, जळगांव, उपसा सिंचन (यांत्रिकी) उप विभाग, जळगांव व सरदार सरोवर उप विभागीय कक्ष क्र.१, जळगांव या बांधकाम कार्यप्रकारातील विभाग व उप विभागीय कार्यालयातील मंजूर पदांचा तपशील.**

| अ.क्र. | वर्गवार पदाचे नांव | विभागीय (१ कार्या.) एकूण पदे बांधकाम कार्यप्रकार | उप विभाग (२ कार्या.) एकूण पदे बांधकाम कार्यप्रकार | उपसा सिंचन (यांत्रिकी) उप विभाग एकूण पदे | एकूण मंजूर पदे |
|---|---|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता | १ | ० | ० | १ |
| २ | उप अभियंता | १ | २ | १ | ४ |
| ३ | कनि. अभि./शा.अभि./सअश्रे-२ | ४ | ८ | २ | १४ |
| ४ | विभागीय लेखापाल | १ | ० | ० | १ |
| ५ | प्रथम लिपिक | १ | ० | ० | १ |
| ६ | सहायक आरेखक / आरेखक | १ | ० | ० | १ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | ५ | २ | ० | ७ |
| ८ | अनुरेखक | १ | २ | ० | ३ |
| ९ | कनिष्ठ लिपिक | ४ | ४ | १ | ९ |
| १० | लघु टं.ले./नि.श्रेणी लघुलेखक | १ | ० | ० | १ |
| ११ | टंकलेखक | ३ | २ | ० | ५ |
| १२ | संगणक | १ | ० | ० | १ |
| १३ | भांडारपाल | १ | ० | ० | १ |
| १४ | सहायक भांडारपाल | १ | ० | ० | १ |
| १५ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ० | ८ | ० | ८ |
| १६ | वाहन चालक | १ | २ | ० | ३ |
| १७ | नाईक | १ | ० | ० | १ |
| १८ | शिपाई | ५ | ४ | १ | १० |
| १९ | चौकीदार | १ | २ | ० | ३ |
| | **एकूण** | **३४** | **३६** | **५** | **७५** |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:30:01 +05'30'

( सु. स. डांगळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**(शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१४/प्र.क्र.२१०/२०१४/आ.(प्रशि), दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे "प्रपत्र-ई")**

**जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव व नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे अंतर्गत अस्तित्वातील व बांधकाम कार्यप्रकारातुन सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव (कडा) या मंडळांतर्गत वर्ग होणाऱ्या ४ उप विभागीय कार्यालय व १६ नव्याने निर्माण होणाऱ्या शाखा कार्यालयांसाठी उपलब्ध मंजूर पदांचा तपशिल**

| **अ.क्र.** | **वर्गवार पदाचे नांव** | **उप विभाग (४ कार्या.) एकूण पदे** |
|---|---|---|
| १ | उप अभियंता | ४ |
| २ | कनिष्ठ अभि./शा.अभि./सअश्रे-२ | १६ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ४ | अनुरेखक | ४ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | ८ |
| ६ | टंकलेखक | ४ |
| ७ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | १६ |
| ८ | वाहन चालक | ४ |
| ९ | शिपाई | ८ |
| १० | चौकीदार | ४ |
| | **एकूण :-** | **७२** |

Subodh Sadashiv Dangle

Digitally signed by Subodh Sadashiv Dangle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subodh Sadashiv Dangle
Date: 2014.09.01 15:30:33 +05'30'

( सु. स. डांगळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन